**शासकीय पैसा शासकीय लेख्याबाहेर ठेवण्यास प्रतिबंध...**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३/कोषा-प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ मार्च, २०१७.

**वाचा :** (१) शासन परिपत्रक क्रमांक: संकिर्ण-१००९/प्र.क्र.६६/कोषा.प्रशा-५, दिनांक १५ जानेवारी,२०१०.
(२) शासन परिपत्रक क्रमांक:मुंविनि-१०१६/प्र.क्र.०६/१६/ विनियम, दिनांक ०४ मार्च, २०१६.

**परिपत्रक:**

आर्थिक वर्षाच्या अखेरीस विशेषत: मार्च महिन्यात विविध विभागांकडून प्रचंड मोठ्या प्रमाणात निधी खर्च केला जात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. काही विभागांकडून ९० ते १०० टक्के निधी हा मार्च मध्ये खर्च केला जात असल्याबाबत महालेखाकार कार्यालयाने देखील सन २०१५ - २०१६ च्या राज्याच्या वित्तीय लेखा खंड-१ व खंड-२ वरील “ओझरता दृष्टिक्षेप” या प्रकाशनात नमुद केले आहे. आर्थिक वर्ष संपताना मोठ्याप्रमाणावर निधी अखर्चित राहणे व मार्च महिन्यात बहुतांश निधी खर्च होणे हे आर्थिक शिस्तीला धरुन नाही.

प्राधान्यक्रम नसणाऱ्या बाबींवरील खर्च निर्धारित व नियमित करण्याच्या दृष्टिने शासनाने दिनांक १७.०१.२०१७ पासून सर्व प्रकारच्या खरेदीवर काही अपवाद वगळता निर्बंध घातले आहेत. सदर परिपत्रकाच्या अनुषंगाने विविध विभागांकडून वित्त विभागाकडे मार्गदर्शन मागण्यासाठी नस्त्या प्राप्त होत आहेत. अशा नस्त्यांना वित्त विभागाकडून प्रकरण निहाय परवानगी दिली जात आहे. तथापि,अशा सर्व प्रकरणी ३१ मार्च पूर्वी कोषागारांकडे आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी देयक सादर करुन रक्कम आहरित केल्यानंतर ती रक्कम आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या खात्यात ३१ मार्च नंतर पडून राहणे खचीतच योग्य नाही. तसे झाल्यास ती वित्तीय अनियमितता होऊ शकते.

आवश्यकता नसताना केवळ अनुदान व्यपगत होऊ नये म्हणुन कोषागारांकडून रक्कम आहरित करणे, सदर रक्कम बँकेमध्ये खाती उघडून जमा करणे असे प्रकारही काही विभागांकडून अवलंबिले जातात. महाराष्ट्र वित्तीय नियम १९५१ मधील नियम ५७ मध्ये तातडीची आवश्यकता असल्याशिवाय कोषागारातून निधी आहरित करु नये अशी स्पष्ट तरतूद आहे. त्यामुळे सदर तरतुदीचे पालन काटेकोरपणे होण्यासाठी कोषागार तथा अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत स्वयंप्रेरितरित्या कार्यवाही होण्याची आवश्यकता आहे. त्यासाठी सदर परिपत्रकाचे तंतोतंत पालन करून घेण्याची जबाबदारी कोषागार आणि अधिदान व लेखा कार्यालयाची राहील.

मार्च महिन्यामध्ये राज्याच्या संचित निधीतून स्वीय प्रपंजी लेख्यात ( पी. एल.ए.) निधी वळवण्यासाठी विभागांकडून कोषागारांकडे/अधिदान व लेखा कार्यालयाकडे देयके/प्रस्ताव सादर होतात. अशा प्रकारे स्वीय प्रपंजी खात्यात जमा केलेला निधी हा बऱ्याचदा दीर्घ काळासाठी अखर्चित राहतो, अशा प्रकारे निधी पडून राहणे आर्थिक शिस्त राखण्याच्या दृष्टीने योग्य नाही. त्यामुळे राज्याच्या तिजोरीवरही ताण

येतो.त्यामुळे अशा प्रकारे मार्च महिन्यात स्वीय प्रपंजी खात्यात निधी जमा करण्याचे प्रस्ताव/ देयके प्राप्त झाल्यास कोषागार/अधिदान व लेखा कार्यालयाने यापुढे पारित करु नये.

**आर्थिक शिस्त राखण्याच्या दृष्टीने कोषागारे आणि अधिदान व लेखा कार्यालयांना पुढील पूरक सूचना देण्यात येत आहेत**

१) संक्षिप्त देयकांच्या बाबतीत संदर्भाधीन वाचा-२,वित्त विभाग शासन परिपत्रक,दिनांक ४ मार्च, २०१६ चे काटेकोर पालन करावे. (सदर परिपत्रक एप्रिल, १९९३ ते दिनांक ३१ मार्च, २०१६ पर्यंत संक्षिप्त देयकांवर काढलेल्या रक्कमांसाठी लागू राहील.) सदर परिपत्रकातील तरतुदींचे पालन न झाल्यास कोषागारांनी कोणतेही संक्षिप्त देयक पारीत करू नये. त्याकरिता सोबत जोडलेल्या प्रपत्र-१ मध्ये नमूद प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे.

२) केवळ अनुदान व्यपगत होऊ नये म्हणून आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागारातून रकमा आहरित करू नयेत.असे प्रयत्न होऊ नयेत यासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्रातील प्रमाणपत्र असल्याखेरीज देयके पारीत करू नयेत.

३) वैयक्तिक लाभ धारकांसाठी असलेल्या योजनांच्या बाबतीत लाभधारक निश्चित न झाल्यामुळे रकमा असंवितरीत राहतात. त्यामुळे लाभधारक ठरलेले नसल्यास केवळ अनुदान व्यपगत होऊ नये यासाठी कोषागारातून रकमा आहरित करू नयेत. तसेच यापूर्वी काढलेल्या रकमा लाभधारक निश्चित न झाल्यामुळे असंवितरीत राहिल्या असल्यास त्या तात्काळ कोषागारात संबंधित लेखाशीर्षाखाली जमा कराव्यात.

४) प्रत्येक वर्षी मार्च महिन्यात आकस्मिक खर्च किंवा वैयक्तिक लाभधारकांसाठी सहाय्यक अनुदानाची देयके कोषागारात सादर करतांना प्रत्येक आहरण व संवितरण अधिकाऱ्याने या परिपत्रकासोबत जोडलेल्या नमुन्यातील प्रमाणपत्र देयकासोबत जोडणे आवश्यक राहील.अशा प्रकारे प्रमाणपत्र असणारी देयके कोषागारात सादर झाल्यास अशी देयके अन्यथा योग्य असल्यास कोषागारांनी पारीत करावीत. कोणत्याही परिस्थितीत असे प्रमाणपत्र असल्याशिवाय कोषागारांनी देयके पारीत करू नयेत.

संदर्भाधिन वाचा १ येथील दि.१५ जानेवारी २०१० चे परिपत्रक याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०३१८१७५४०४२००५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2017.03.18 17:55:18 +05'30'

(अनुदीप दिघे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,

५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य वित्त व लेखा अधिकारी,
९. मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
१०. प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
११. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१२. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र,नागपूर.
१३. प्रधान महालेखापाल(लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१४. महालेखापाल(लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१५. महालेखापाल(वाणिज्यिक लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
१६. सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१७. प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा), मुंबई.
१८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
२०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२१. संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, मुंबई.
२२. सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा,मुंबई/पूणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
२३. सर्व जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी,स्थानिक निधी लेखा,
२४. उपसंचालक, लेखा व कोषागारे, पूणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोकण भवन, नवीमुंबई.
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ वांद्रे.
२६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२७. सर्व कोषागारे अधिकारी,
२८. सर्व उपकोषागार अधिकारी,
२९. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
३०. जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

## प्रपत्र -१

प्रमाणपत्र

मी------------------------------------------(आहरण व संवितरण अधिका-याचे नांव) ----------------------------------------------------अधिकारी (पदनाम दर्शविणे) ------ ----------------------------------------------या कार्यालयाकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून खालीलप्रमाणे प्रमाणित करीत आहे.

**अ) आकस्मिक खर्चाचे तपशीलवार देयक**

१. देयक क्रमांक----------दिनांक--------रक्कम रुपये--------हे आकस्मिक खर्चाचे देयक कोषागारात सादर करीत असून सदर देयकाची रक्कम तात्काळ खर्चासाठी आवश्यक आहे.

२. वर नमूद केलेल्या आकस्मिक खर्चाच्या देयकाप्रित्यर्थ दरपत्रके/ निविदा मागविण्याची प्रक्रिया पुर्ण झाली असून आवश्यक वस्तूंचा/साधनसामुग्रीचा पुरवठा आदेशातील अटी व शर्तीनुसार पूर्ण झालेला आहे.त्यामुळे सदर देयकाद्वारे आहरीत करण्यात येणारी रक्कम मार्च--------अखेरपर्यंत खर्च होईल याची जबाबदारी माझी राहील.

**ब) आकस्मिक खर्चाचे संक्षिप्त देयक**

१. देयक क्रमांक-------दिनांक--------रक्कम रुपये--------हे आकस्मिक खर्चाचे देयक कोषागारात सादर करीत असून सदर देयकाची रक्कम तात्काळ खर्चासाठी आवश्यक आहे.

**क) वैयक्तिक लाभधारकांना लाभ देण्याकरिता सादर करावयाचे सहाय्यक अनुदान देयक (म.को.नि. नमुना क्र.४४)**

१. देयक क्रमांक-------दिनांक--------रक्कम रुपये--------हे वैयक्तिक लाभधारकांना लाभ देण्याकरिता सादर करावयाचे सहाय्यक अनुदान या प्रकारचे देयक कोषागारात सादर करीत असून सदर देयकाची रक्कम तात्काळ खर्चासाठी आवश्यक आहे

२. वैयक्तिक लाभधारकांना लाभ देण्याकरिता सादर करावयाचे सहाय्यक अनुदान देयकाची संपूर्ण रक्कम मार्च--------- या महिन्याच्या अखेरपर्यंत खर्ची पडण्याच्या दृष्टीने आवश्यक ती पुर्व तयारी पूर्ण झाली असून / साहित्य /साधन सामुग्री स्वरूपात देय असलेल्या वस्तू/ साहित्य /साधनसामुग्री खरेदीकरिता दरपत्रके/ निविदा मागविण्याची प्रक्रिया पूर्ण झाली असून आवश्यक वस्तूंचा/साधनसामुग्रीचा पुरवठा मार्च --------- अखेरपर्यंत पूर्ण होईल अशी माझी खात्री झालेली आहे. तसेच लाभधारकांची यादी अंतिम करण्यात येऊन त्यास सक्षम मंजुरी घेण्यात आली आहे. अशा लाभधारकांना त्यांच्या देय रकमा मार्च ---------अखेरपर्यंत अदा करणे शक्य होईल,असे मी प्रमाणित करीत आहे.

**(लागू असलेल्या प्रमाणपत्रावर ✓ अशी खूण करावी)**

**ड) उपरोक्त सर्व देयकांसाठी प्रमाणपत्र**

१. सदर देयकाआधारे आहरीत करण्यात आलेली रक्कम मार्च-------- च्या आत खर्च होऊ शकत नसल्यास ती दिनांक ३१ मार्च, ------- अखेर शासन खाती जमा करण्याची हमी मी देत आहे. तसेच मी प्रमाणित करतो की, अशी अखर्चित रक्कम अनुदान व्यपगत होऊ नयेत म्हणून कोणत्याही परिस्थितीत वैयक्तिक खाते लेख्यात (पी.एल.ए.) अथवा इतर कोणत्याही बँक खात्यात जमा करण्यात येणार नाही.

२. कोणत्याही परिस्थितीत सदर देयकाआधारे आहरीत करण्यात आलेली रक्कम मार्च-------- अखेरपर्यंत खर्च करण्याची मी हमी देत असून जर खर्च झाला नाही तर त्यासंदर्भात मी वैयक्तिकरित्या जबाबदार राहीन.

३. प्रमाणित करण्यात येते की, आहरण व संवितरण अधिका-यांच्या आज रोजी बँक खात्यात वेतन व भत्ते याव्यतिरिक्त असलेली योजनेसाठीची कोणतीच रक्कम शिल्लक नसून अशा सर्व खर्च झालेल्या रक्कमांचा वापर योग्य त्या प्रयोजनासाठी करण्यात आलेला आहे.

४. प्रमाणित करण्यात येते की, आहरण व संवितरण अधिका-यांच्या बँक खात्यातील वेतन व भत्ते याव्यतिरिक्त योजनांसाठीच्या अखर्चित रक्कमा या शासन खाती चलन क्र.------------ दि.---------------अन्वये भरणा केल्या असून सोबत चलनाच्या प्रती जोडल्या आहेत.

आहरण व संवितरण अधिका-याचे नाव, पदनाम व स्वाक्षरी

कार्यालयाचा शिक्का